**वर्धमान सैनिकी शाळा (पूर्वीचे नाव राणी लक्ष्मीबाई मुलींची सैनिकी शाळा) वडधामना, ता. हिंगणा, जि. नागपूर या सैनिकी शाळेस इयत्ता ११ वी व नैसर्गिक वाढीने इ.१२ वी (विज्ञान शास्त्र शाखा) सर्वसाधारण तुकडी मंजूर करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इसैशा-२०१७/(१३३/१७)/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ३२
तारीख: २ नोव्हेंबर, २०२०

वाचा -

१) **शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा १०९५/(२७८/९५)/माशि-८, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५**
२) **शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, क्रमांक इसैशा १००१/(१८५/२००१)/माशि-७, दिनांक ५ जुलै, २००२**

**प्रस्तावना-**

राज्यात खाजगी व सक्षम स्वयंसेवी संस्थांना माध्यमिक स्तरावर सैनिकी शिक्षण देणा-या शाळा सुरु करण्यास संदर्भाधीन क्र.(१) येथील दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ च्या शासन निर्णयान्वये परवानगी दिली आहे. सन १९९६-९७ पासून शासनाने परवानगी दिलेल्या ज्या सैनिकी शाळेमध्ये इयत्ता १० वी पर्यंतचे वर्ग आहेत तेथे इयत्ता ११ वी व नैसर्गिक वाढीने इयत्ता १२ वी चा शास्त्र (विज्ञान ) शाखा अभ्यासक्रम सुरु करण्यास संदर्भाधीन क्र.(२) येथील दिनांक ५ जुलै, २००२ च्या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे.

२. वर्धमान सैनिकी शाळा (पूर्वीचे नाव राणी लक्ष्मीबाई मुलींची सैनिकी शाळा) वडधामना, ता. हिंगणा, जि. नागपूर या शाळेस शासन पत्र क्र. ईसैशा-२००४/७३७/२००४/माशि-७, दिनांक २४.०८.२००४ अन्वये इ. ५ वी पासून सर्वसाधारण मुलींची तुकडी सुरु करण्याकरिता सन २००४-०५ या शैक्षणिक वर्षापासून मान्यता दिली आहे. सदर सैनिकी शाळेत सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता ११ वी व नैसर्गिक वाढीने सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १२ वी साठी सर्वसाधारण तुकडी (विज्ञान शास्त्र शाखा ) सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वर्धमान सैनिकी शाळा (पूर्वीचे नाव राणी लक्ष्मीबाई मुलींची सैनिकी शाळा) वडधामना, ता. हिंगणा, जि. नागपूर सैनिकी शाळेला सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता ११ वी ची १(एक) तुकडी व नैसर्गिक वाढीने सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून इयत्ता १२ वी ची १ (एक) याप्रमाणे एकूण २ (दोन) सर्वसाधारण तुकडयांना (विज्ञान शास्त्र शाखा) मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सैनिकी शाळेस परिच्छेद १ प्रमाणे सर्वसाधारण तुकडी (विज्ञान शास्त्र शाखा) सुरू करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तीच्या व पटसंख्येच्या निकषांची पूर्तता करण्याच्या अधीन राहून तसेच भौतिक सोयी सुविधांची उपलब्धता विचारात घेऊन मान्यता देण्यात येत आहे

३. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार पदभरतीचे बंधन असल्यामुळे पद मंजूरीची कार्यवाही पदभरतीचे बंधन उठल्यावर स्वतंत्रपणे करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १७१/व्यय-५, दिनांक २६.०२.२०२० अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०२११५४२९०१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.11.02 11:57:53 +05'30'

**( इ. मु. काझी )**

**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, मुंबई
३. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, मुंबई
४. सर्व विधान सभा व विधान परिषद सदस्य
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
९. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
१०. शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, नागपूर
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. निवड नस्ती (एसएम-६)